राज्यातील सहकारी साखर कारखान्यांच्या
कार्यकारी संचालकांचे नवीन पॅनेल बनविणे

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- ससाका-२०२१/प्र.क्र. २५१ /२५-स,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १८/०४/२०२२.

वाचा:-

१. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. ससाका १७९६/प्र.क्र.३१९/२५-स, दि.०३/०४/१९९७,
२.शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. ससाका १७२०/प्र.क्र.२०७/२५-स, दि.१६/०९/२००३
३. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. ससाका २७२०/प्र.क्र.२०७/२५-स, दि.२५/०२/२००५
४. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, दि.१८/०९/२०१०
५. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. ससाका २०१५/प्र.क्र.१५१/२५-स, दि.०२/१२/२०१५
६. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. ससाका २०१५/प्र.क्र.१५१/२५-स, दि.१७/०२/२०१६
७. साखर आयुक्त, पुणे यांचे जा.क्र.साआ/प्रशासन/का. सं. पॅनेल/१०५६/२०१५, दि.१३/०४/२०१५. रोजीचे पत्र आणि दि.१७/०१/२०१७ रोजीचे शुद्धीपत्रक
८. साखर आयुक्त पुणे यांचे जा.क्र.८१६८/२०२०, दि.१०/०२/२०२०
९.सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मुंबई यांचेकडील पत्र क्र. ससाका २०२१/प्र.क्र.१०६/२५-स, दि.०५/०८/२०२१
१०. सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागाचे अ.शा.पत्र क्र. ससाका-२०२१/प्र.क्र.२५०/२५-स,दि.०२/१२/२०२१
११. साखर आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.साआ/प्रशा-३/का. सं. पॅनेल/४/१२३/२०२२/१९२७, दि.०९.०२.२०२२.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्रात सहकारी साखर कारखान्यांची संख्या १०७ असून बहुराज्यीय सहकारी साखर कारखान्यांची संख्या ११ इतकी आहे. सहकारी साखर कारखान्यांच्या कार्यकारी संचालकांची जबाबदारी महत्वाची आहे. यापूर्वी राज्यातील सहकारी साखर कारखान्यांवर कार्यकारी संचालक पदी काम करण्यासाठी सन २००५ मध्ये ६६ आणि सन २०१५ मध्ये १०० कार्यकारी संचालकांचे पॅनेल तयार करण्यात आले होते. त्यापैकी सद्य:स्थितीत एकूण ६९ कार्यकारी संचालक विविध सहकारी साखर कारखान्यांवर कार्यरत आहेत.

साखर कारखानदारी बदलत असून मोठ्या प्रमाणावर ईथेनॉल, बायोगॅस, फार्मासेक्टर विकसित होत आहे. त्यामुळे नव्या आव्हानांना सामोरे जाण्यासाठी काही बदलांसह राज्यातील सहकारी साखर कारखान्यांच्या कार्यकारी संचालकांचे नवीन पॅनेल करणेबाबत प्रस्तावित आहे. राज्यातील सहकारी साखर कारखान्यांची पुढील ५ वर्षांसाठीची गरज विचारात घेऊन अतिरिक्त ५० कार्यकारी संचालकांचे पॅनेल बनविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे

**शासन निर्णय** :

राज्यातील सहकारी साखर कारखान्यांच्या कार्यकारी संचालक पदावर पात्र उमेदवारांच्या निवडीसाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

| | | |
|---|---|---|
| १) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे | : | अध्यक्ष |
| २) महासंचालक, वसंतदादा शुगर इन्स्टिट्यूट, पुणे | : | सदस्य |
| ३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ, मुंबई | : | सदस्य |
| ४) सहसंचालक (प्रशासन), साखर आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | : | सदस्य सचिव |
| ५) या क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्ती (जास्तीत जास्त दोन) | : | विशेष निमंत्रित |

उपरोक्त गठित समितीमार्फत नवीन पॅनेलसाठी ५० कार्यकारी संचालकांची निवड करण्यात येईल. समितीद्वारे निवड करण्यात आलेल्या कार्यकारी संचालकांची नियुक्ती प्रथमत: कनिष्ठ वेतनश्रेणीत करण्यात येईल.

साखर आयुक्त कार्यालयाने यापूर्वी जाहिर केलेल्या सन २००५ च्या पॅनेलमधील **६६** कार्यकारी संचालकांचा आणि सन २०१५ च्या पॅनेलमधील **१००** कार्यकारी संचालकांचा तसेच या शासन निर्णयानुसार निवड होणाऱ्या **५०** कार्यकारी संचालकांचा समावेश कार्यकारी संचालकांच्या नवीन पॅनेलमध्ये करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. राज्यातील सर्व सहकारी साखर कारखान्यांनी या पॅनेलमधील कार्यकारी संचालकाची नेमणूक करणे बंधनकारक राहील.

या शासन निर्णयानुसार नवीन कार्यकारी संचालकाची निवड करतांना काही अडचणी उद्भवल्यास अथवा संदिग्धता असल्यास त्याचे निवारण साखर आयुक्तांनी त्यांचे स्तरावर करावे.

सहकारी साखर कारखान्यांच्या कार्यकारी संचालकाच्या पदावर निवड होण्यासाठीची परिक्षा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यात येईल तसेच या पदासाठी अपेक्षित शैक्षणिक अर्हता, वयोमर्यादा, परिक्षेचे स्वरुप आणि नियुक्तीची कार्यपद्धती इत्यादी बाबी प्रस्तुत शासन निर्णयाच्या सोबत जोडलेल्या जोडपत्रात दर्शविल्याप्रमाणे राहतील.

प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक २०२२०४१८१५२८१३५८०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

SHINGADE ANKUSH PANDURANG

Digitally signed by SHINGADE ANKUSH PANDURANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, pseudonym=18BA78965A42BF3AA081DE760471DB6306C88F1D, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=SHINGADE ANKUSH PANDURANG
Date: 2022.04.18 15:31:05 +05'30'

**( अंकुश पां. शिंगाडे )**
**उपसचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. साखर आयुक्त, साखर संकुल, शिवाजीनगर, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व सहकारी साखर कारखाने ( साखर संघामार्फत)
३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहाकारी साखर कारखाना संघ लि.मुबई.
४.विशेष लेखा परिक्षक सहकारी संस्था ( साखर) सर्व.
५. सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर) .
६. महासंचालक, वसंतदादा शुगर इन्स्टिटयूट, मांजरी पुणे.
७.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई
८.निवड नस्ती-२५-स संग्रहार्थ.

## कार्यकारी संचालक, सहकारी साखर कारखाना या पदावर नियुक्तीसाठी वयोमर्यादा, शैक्षणिक अर्हता, आणि नियुक्तीच्या कार्यपद्धतीबाबत नियमावली
## शासन निर्णय क्र.ससाका-२०२१/प्र.क्र.२५१/२५-स, दि.१८एप्रिल, २०२२ चे जोडपत्र

**१) उमेदवाराची वयोमर्यादा** :

उमेदवाराचे वय ३० वर्षापेक्षा कमी आणि ५० वर्षापेक्षा अधिक नसावे.

२) **उमेदवाराची शैक्षणिक पात्रता** :

१) कृषी शाखेचा पदव्युत्तर पदवीधर (Post Graduate),
२) वाणिज्य शाखेचा पदव्युत्तर पदवीधर (M. Com)
३) B.E. (मेकॅनिकल/ केमिकल/ इलेक्ट्रिकल)
४) M.Sc. (Wine brewing and Alchohol Technology)
५) Chartered Accountant
६) ICWA
७) Company Secretary
८) MBA (Finance)/ MBA (HR)
९) विभागप्रमुख/ खातेप्रमुख म्हणून काम करणाऱ्या उमेदवारांसाठी मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी आवश्यक आहे. आज रोजी साखर कारखान्यांत किमान **५** वर्षे कार्यरत असणाऱ्या उमेदवारांनी प्रादेशिक सहसंचालक (साखर) व साखर कारखान्याच्या लेटरहेडवर संबंधित कारखान्याच्या कार्यकारी संचालक व प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांचे प्रमाणिकरण आवश्यक आहे.
१०) मराठी, इंग्रजी व हिंदी भाषेचे ज्ञान आवश्यक.

**३) वेतनश्रेणी :**

कार्यकारी संचालकांच्या पॅनेलवर नव्याने नियुक्त होणाऱ्या कार्यकारी संचालकांना नियुक्तीच्या वेळी कनिष्ठ वेतनश्रेणी रू.**१५६००-३९०००** ग्रेड पे रू.**५,४००/-** लागू असेल.

**४) परिक्षेचे स्वरूप :**

- पहिला टप्पा : वस्तूनिष्ठ बहुपर्यायी चाळणी परीक्षा (१०० प्रश्न प्रत्येकी २ गुण)
- दुसरा टप्पा : लेखी परीक्षा (५ मुख्य प्रश्न प्रत्येकी १५ गुण)
- तिसरा टप्पा : मौखिक/ तोंडी परीक्षा (२५ गुण)

(i) पहिल्या टप्प्यातील वस्तूनिष्ठ बहुपर्यायी परीक्षा (Objective) ही चाळणी स्वरूपाची असेल. या परिक्षेत ज्या उमेदवारांना किमान ७० गुणांपेक्षा जास्त गुण मिळतील असे सर्व उमेदवार दुसऱ्या टप्प्यातील लेखी परीक्षेस पात्र राहतील.

(ii) पहिल्या टप्प्यातील पात्र उमेदवार लेखी परिक्षेला पात्र असतील. लेखी परीक्षेतील उमेदवारांची गुणानुक्रमे यादी तयार करण्यात येईल. त्यापैकी सर्वोच्च गुणधारक उमेदवार १:३ पद्धतीने तोंडी परिक्षेस पात्र असतील.

(iii) लेखी परीक्षा व तोंडी परीक्षेतील गुणांची बेरीज करून उमेदवारांची १०० मार्कांची अंतिम गुणपत्रिका बनविली जाईल. त्यातील गुणानुक्रमाने जास्तीत जास्त पहिल्या ५० उमेदवारांना कार्यकारी संचालकांचे पॅनेलवर समाविष्ट केले जाईल.

**५) कार्यकारी संचालकांचे नविन पॅनेल तयार करताना राबवावयाची कार्यपद्धती :**

कार्यकारी संचालकांची निवड प्रक्रिया वैकुंठ मेहता नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ को-ऑपरेटीव्ह मॅनेजमेंट, पुणे / एम. के. सी. एल. या अथवा इतर सक्षम बाह्य यंत्रणेकडून करणेत येईल. त्यासाठी आवश्यक अटी व नियम, शैक्षणिक पात्रता इ. बाबींसह प्रस्ताव निवड केलेल्या संस्थेस देता येईल.

**६) कार्यकारी संचालकांच्या पॅनेलचा कालावधी :**

सन २००५ मध्ये व सन २०१५ मध्ये बनवलेल्या पॅनेलमधील कार्यरत व पात्र कार्यकारी संचालकांची यादी पूर्वीची असून त्या यादीमध्ये या ५० नवीन कार्यकारी संचालकांची नावे समाविष्ट करून कार्यकारी संचालकांची एक अंतिम यादी पुन्हा प्रसिद्ध करण्यात यावी. यापुढे कार्यकारी संचालकांचे पॅनेल म्हणून याच यादीतील कार्यकारी संचालक काम करतील. या पॅनेलला कोणतीही मुदत असणार नाही.